**क्षमतेपेक्षा अधिक भार वाहणाऱ्या वाहनांवर सार्वजनिक मालमत्तेस नुकसान प्रतिबंध अधिनियम १९८४ नुसार कारवाई करणेबाबतचे धोरण....**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः याचिका -०१११८/प्र.क्र.३८४/परि-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १४ फेब्रुवारी, २०१९.

<u>वाचा -</u>१) शासन निर्णय गृह (परिवहन) विभाग क्र. सितना ०७१२/प्र.क्र.४१/परि-४, दि.१७/०६/२०१३.
२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र.पआका/ज.या.०१ /२०१६/ का.२ (अ)/ जा.क्र. १७२८९, दि.२१.१२.२०१८.
३) अपर परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र.पआका/ज.या.०१/२०१६/ का.२ (अ)/ जा.क्र.१२९४, दि.३०.०१.२०१९.

<u>प्रस्तावना :-</u>

माल वाहतूक करणाऱ्या वाहनांनी त्यांच्या क्षमतेपेक्षा जादा मालाची वाहतूक करणाऱ्या वाहनांवर मोटार वाहन अधिनियम १९८८ च्या कलम ११३ व ११४ नुसार वाहनचालक वा वाहनधारक यांचेविरुध्द कारवाई करण्याची तरतूद करण्यात आलेली आहे. सदर तरतूदीनुसार जादा असलेला माल उतरविल्यानंतर तसेच तडजोड शुल्क भरण्यास तयार असल्यास कलम २०० नुसार तडजोड शुल्क स्विकारण्याची अन्यथा सदर प्रकरण न्यायालयात दाखल करण्याची कार्यवाही करण्यात येत असते. क्षमतेपेक्षा अधिक भार पाहणाऱ्या वाहनांवर मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने जनहितार्थ रिट याचिका क्र. १/१६ मध्ये सार्वजनिक मालमत्तेस नुकसान प्रतिबंध अधिनियम, १९८४ नुसार कारवाई करण्याचे आदेश दिलेले आहेत. त्याचप्रमाणे संदर्भाधिन दि.१७/०६/२०१३ च्या शासन निर्णयान्वये अधिक भार वाहणाऱ्या वाहनांना आळा घालण्यासाठी टोल नाक्यावर वजन काटे व CCTV कॅमेरे बसविण्याबाबत धोरण ठरविण्याचे आदेश देण्यात आलेले आहेत. मा.उच्च न्यायालयाचे आदेश विचारात घेऊन यासंदर्भातील धोरण विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

क्षमतेशिवाय जादा मालाची वाहतूक करताना दोषी आढळणाऱ्या वाहनांच्या प्रकरणी मोटार वाहन अधिनियम १९८८ च्या कलम ११३ व ११४ नुसार कारवाई करण्यात यावी.

२. त्याचप्रमाणे विहित केलेल्या सर्वाधिक ॲक्सेल लोडमर्यादेपेक्षा अधिक वजन वाहून नेणाऱ्या वाहनांवर सार्वजनिक मालमत्तेस प्रतिबंध १९८४ (Prevention of Damaged to Public Property Act, १९८४) च्या तरतूदीनुसार त्यास कारणीभूत असणाऱ्या वाहतूकदार तसेच इतर घटकांविरुध्द कायदेशीर कारवाई करण्यासाठी पोलीस स्टेशनमध्ये प्रथम खबरी अहवाल (F.I.R.) दाखल करण्याची कारवाई करण्यात यावी.

३. अशा अतिभार वाहून नेणाऱ्या वाहनांवर कारवाई करण्यासाठी मोटार वाहन विभागाच्या वायुवेग पथकांना पोर्टेबल वजनकाटे उपलब्ध करुन देण्यात यावेत. सदर पोर्टेबल वजनकाटयामार्फत अशा अवजड वाहनांचे वजन घेण्याची कार्यवाही करण्यात यावी.

४. त्याचप्रमाणे, वायुवेग पथकांच्या गाडयांमार्फत व्हिडीओ चित्रीकरण करण्यासाठी गाडयांवर कॅमेरे तसेच या गाडयांमध्ये डीव्हीआर बसविण्याची कार्यवाही करण्यात यावी. या कॅमेऱ्यांमार्फत केलेले व्हिडीओ चित्रीकरण वेळोवेळी वायुवेग पथकांनी त्यांच्या कार्यालयात जमा करुन ते वेळोवेळी जतन करुन ठेवण्यात यावे.

५. पोर्टेबल वजनकाटे वायुवेग पथकाच्या वाहनांना कॅमेरे बसविण्यासंदर्भात सदरच्या खरेदी प्रकरणी प्रक्रिया विहीत पध्दतीने करुन त्याची अंमलबजावणी पुढील ६ महिन्यांच्या आत होईल, याबाबतची दक्षता परिवहन आयुक्त कार्यालयाने घ्यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१४१४४९१०७१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NITIN JYOTINATH GHIRATKAR

Digitally signed by NITIN JYOTINATH GHIRATKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb712ac44dfd391a1a4d7d8b24cf743fa81a59477dff3f6805f105ac91db1e0, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=21524d9e84e57776ba1ee448660f3699bdd08917801a19974a72d568f57f5401, ou=HOME DEPARTMENT GOVT OF MAHARASHTRA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=NITIN JYOTINATH GHIRATKAR
Date: 2019.02.16 14:39:25 +05'30'

**(नि.ज्यो.घिरटकर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री,परिवहन, मंत्रालय, मुंबई.
४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सचिव, रस्ते, सार्वजनिक बांधकाम विभाग.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, रस्ते विकास महामंडळ.
७) संचालक, राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण, ठाणे/नाशिक/पुणे/नागपूर.
८) सर्व पोलीस आयुक्त.
९) सर्व विभागीय आयुक्त.
१०) सर्व जिल्हाधिकारी.
११) सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक/पोलीस उप आयुक्त.
१२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१३) सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
१४) मालवाहतूकदार संघटना (संबंधित प्रादेशिक /उप प्रादेशिक परिवहन कार्यालयामार्फत)
१५) सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी.
१६) सर्व उपप्रादेशिक परिवहन अधिकारी.
१७) सर्व सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी.
१८) सर्व मोटार वाहन निरिक्षक.
१९) सर्व सहाय्यक मोटार वाहन निरिक्षक.
२०) निवड नस्ती (परि- २).